**केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अंतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास (RDA) योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०२०-२१ चा अखर्चित निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील तरतूदीतून वितरण करणेबाबत.**

**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०१बी१६१)**

**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०१बी१७९)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२२/प्र.क्र.०३/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २४ मार्च, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय/ परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, दि.२४.६.२०२१, दि.१४.१०.२०१, दि.२८.३.२०२२, दि.३.२.२०२२ व दि.१७.३.२०२२

२) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.No.१-१/२०२०-RFS-III, दि.१२.४.२०२१

३) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.राशेअ-४४२१/प्र.क्र.१५६/८-अे

४) शासन निर्णय समक्रमांक दि.१३.१.२०२२

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अंतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास (RDA) या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२१-२२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०१ पीक संवर्धन, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०९) कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी१६१, ३३-अर्थसहाय्य खाली रु.२००.०० लाख तर (०१) (१०) कृषी उन्नती योजना राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी१७९, ३३-अर्थसहाय्य खाली रु.१३५.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. संदर्भाधीन दि.१३.१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष २४०१बी१६१, ३३-अर्थसहाय्य मध्ये रु.७६.७० लाख तर लेखाशिर्ष २४०१बी१७९, ३३-अर्थसहाय्य मध्ये रु.५१.१३लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.२८.१.२०२२, दि.३.२.२०२२ व दि.१७.३.२०२२ रोजीच्या शासन निर्णय / परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्या मागील वर्षामधील निधी वितरणाकरिता वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य केले आहे. या अनुषंगाने कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन सन २०२०-२१ या वर्षातील अखर्चित निधी करीता उपरोक्त सन २०२१-२२ करीता अर्थसंकल्पीत तरतूदीतून (०१) (०९) कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी१६१, ३३-अर्थसहाय्य याकरिता रु.२५.८५ लाख तर (०१) (१०) कृषी उन्नती योजना राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी१७९, ३३-अर्थसहाय्य याकरिता रु.१५.०१ लाख असा एकूण रु.४०.८६ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (कृषी व पदुम) विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.२८.१.२०२२, दि.३.२.२०२२ व दि.१७.३.२०२२ रोजीच्या शासन निर्णय / परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.२८.१.२०२२, दि.३.२.२०२२ व दि.१७.३.२०२२ रोजीच्या शासन निर्णय / परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१७६/व्यय-१४, दि.१७.३.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२५१२३०१८५९२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.03.25 12:32:14 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.